**इतर मागास बहुजन कल्याण विभागाच्या अधिनस्त स्वयंसेवी संस्थेमार्फत चालविल्या जाणाऱ्या आश्रमशाळांतील शिक्षणसेवकांच्या मानधनात वाढ करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**इतर मागास बहुजन कल्याण विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : विभशा-२०२३/प्र.क्र.९०/विजाभज-१**
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
दिनांकः- १५ मे, २०२३.

**संदर्भ**:- १.शासन पत्र, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग क्रमांक-विभशा-२०१०/ प्र.क्र.१४९/मावक, दिनांक २९ ऑक्टोबर, २०१०.

२. शासन निर्णय, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग क्रमांक-पीआरई-२००८/ (३१३/०८)/प्राशि-१, १७ सप्टेंबर, २०११.

३.शासन परिपत्रक, इमाव, साशैमाप्र, विजाभज आणि विमाप्र कल्याण विभाग क्रमांक- विभशा-२०१९/प्र.क्र.८८६/विजाभज-२, दिनांक ९ सप्टेंबर, २०१९.

४. शासन परिपत्रक, इमाव, साशैमाप्र, विजाभज आणि विमाप्र कल्याण विभाग क्रमांक- विभशा-२०१९/प्र.क्र.८८६/विजाभज-२, दिनांक १८ सप्टेंबर, २०१९.

५. शासन निर्णय, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग क्रमांक- संकीर्ण-२०२०/प्र.क्र.२६०/टिएनटि-१, ७ फेब्रुवारी, २०२३.

**प्रस्तावना:-**

शालेय शिक्षण विभागाकडून शिक्षण सेवक योजना कार्यान्वित करण्यात आलेली आहे. त्यानुसार सदरहू योजना शासन पत्र संदर्भ क्र.०१ अन्वये या विभागातील विजाभज प्रवर्गाच्या आश्रमशाळांना लागू करण्यात आली आहे. त्यानुसार या विभागामार्फत चालविण्यात येणाऱ्या विजाभज प्रवर्गाच्या प्राथमिक, माध्यमिक व उच्च माध्यमिक आश्रमशाळा, विद्यानिकेतन तसेच ऊसतोड कामगारांच्या मुलां/मुलींसाठीच्या आश्रमशाळांमध्ये शिक्षण सेवकपदी नियुक्त करण्यात आलेल्या कर्मचाऱ्यांना नियुक्तीच्या दिनांकापासून प्रथम तीन वर्षाकरीता शालेय शिक्षण विभागाने ठरवून दिलेल्या दरानुसार मानधन अदा करण्यात येते. सदर मानधन कमी असल्याने, शासनाने राज्यातील शालेय शिक्षण व क्रीडा विभागाच्या आस्थापनेवरील प्राथमिक, माध्यमिक व उच्च माध्यमिक/कनिष्ठ महाविद्यालयामधील शिक्षण सेवकांच्या मानधनात वाढ करण्याबाबत

मा.मंत्रिमंडळाने दि.२२/१२/२०२२ रोजी घेतलेल्या निर्णयानुसार शासन निर्णय संदर्भ क्र.०५ अन्वये शिक्षण सेवकांच्या मानधनात वाढ करण्यात निर्णय घेतला आहे.

शालेय शिक्षण व क्रीडा विभागाचे निर्णय/आदेश/परिपत्रके या विभागास लागू करण्यात येत असल्याने या विभागाकडून चालविण्यात येणाऱ्या विजाभज प्रवर्गाच्या आश्रमशाळांमधील शिक्षण सेवकांच्या मानधनात वाढ करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

इतर मागास बहुजन कल्याम विभागामार्फत चालविण्यात येणाऱ्या विजाभज प्रवर्गाच्या प्राथमिक, माध्यमिक व उच्च माध्यमिक आश्रमशाळा, विद्यानिकेतन तसेच ऊसतोड कामगारांच्या मुलां/मुलींसाठीच्या आश्रमशाळांमधील शिक्षण सेवकांच्या मानधनात शासन निर्णय, शालेय शिक्षण विभाग, दि.७/०२/२०२३ निर्णयानुसार पुढीलप्रमाणे वाढ करण्यास शासनाची मान्यता देण्यात येत आहे.

| **अ.क्र.** | **शिक्षण सेवकांचे वर्ग** | **शासन निर्णय, शालेय शिक्षण विभाग दि.१७/०९/२०११ नुसार सध्या देण्यात येणारे मानधन** | **सुधारित मानधन** |
|---|---|---|---|
| १. | प्राथमिक व उच्च प्राथमिक | रु.६,०००/- | रु.१६,०००/- |
| २. | माध्यमिक | रु.८,०००/- | रु.१८,०००/- |
| ३. | उच्च माध्यमिक/कनिष्ठ महाविद्यालय | रु.९,०००/- | रु.२०,०००/- |

२. शिक्षण सेवकांच्या मानधनातील वाढ ही **दि.०१ जानेवारी,२०२३** पासून लागू राहील.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक २०२३०५१५१८२५२३७१३४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

NANDKUMAR VERMA

Digitally signed by NANDKUMAR VERMA
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=OTHER BACKWARD BAHUJAN WELFARE DEPARTMENT,
2.5.4.20=c98b875883e76c14d91ed7b89546e6c11e439cad32d7f5cff487862cc567ee39, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=DCD3577EBF0E05E2A8B57095C152DC6CFB37C2BB83DA197788645DD8A362EBC5, cn=NANDKUMAR VERMA
Date: 2023.05.15 18:25:47 +05'30'

**नंद कुमार(भा.प्र.से.),**
**अपर मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मा.राज्यपाल, महाराष्ट्र राज्य यांचे सचिव, मलबार हिल, मुंबई.

२. मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई.
३. मा.उपमुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई.
४. मा.सभापती, महाराष्ट्र विधान परिषद, महाराष्ट्र विधानमंडळ, सचिवालय,मुंबई.
५. मा.उपसभापती, महाराष्ट्र विधान परिषद, महाराष्ट्र विधानमंडळ, सचिवालय,मुंबई.
६. मा.अध्यक्ष, महाराष्ट्र विधानसभा, महाराष्ट्र विधानमंडळ, सचिवालय,मुंबई.
७. मा.उपाध्यक्ष, महाराष्ट्र विधानसभा, महाराष्ट्र विधानमंडळ, सचिवालय,मुंबई.
८. मा.विरोधी पक्षनेता, विधानपरिषद/विधानसभा, महाराष्ट्र विधानमंडळ, सचिवालय,मुंबई.
९. मा मंत्री, इतर मागास बहुजन कल्याण यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
१०.मा.विधानपरिषद/विधानसभा सदस्य (सर्व).
११.मा.मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई.
१२.महालेखापाल, महाराष्ट्र-१/२, (लेखापरिक्षा/ लेखा अनुज्ञेयता), मुंबई/नागपूर.
१३.संचालक, इतर मागास बहुजन कल्याण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.
१४.सहसंचालक, लेखा व कोषागारे, संगणक कक्ष, नवीन प्रशासन भवन, ५ वा मजला, मुंबई.
१५.प्रादेशिक उपसंचालक, इतर मागास बहुजन कल्याण (प्रादेशिक) विभाग (सर्व).
१६.सहायक आयुक्त, समाज कल्याण (सर्व).
१७.जिल्हा कोषागार अधिकारी (सर्व).
१८. कक्ष अधिकारी (अर्थसंकल्प/रोखशाखा), इतर मागास बहुजन कल्याण विभाग, मंत्रालय, मुंबई.
१९.अपर मुख्य सचिव / प्रधान सचिव / सचिव, वित्त विभाग/नियोजन विभाग यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई
२०.अपर मुख्य सचिव, इतर मागास बहुजन कल्याण विभाग यांचे स्विय सहाय्यक,मंत्रालय, मुंबई.
२१.निवडनस्ती / विजाभज-१.